मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत सन २०२४-२५ मध्ये (सुक्ष्म सिंचन) घटकांतर्गत देण्यात येणाऱ्या पूरक अनुदाना करिता ₹१४४.०० कोटी निधी वितरीत करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : कृवपदुम-२५०१६/१५/२०२५-MAG-१४A-AGRICULTURE AND ADF**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ :**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. कोशाशे-४२१८/प्र.क्र.८६/८अे दिनांक १९ ऑगस्ट, २०१९.
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. प्रकृसिं-०६१९/प्र.क्र.१६४/१४-अे, दिनांक १८ नोव्हेंबर,२०२१.
३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.७५/१४-अे, दिनांक २९ जून,२०२२.
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. मुशाशे-०५२४/प्र.क्र.११३/१४-अे, दिनांक १६ मे,२०२४.
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/मृदसं/वै.शेततळे/निधीमागणी/मृद-७/११९७१/२०२४, दिनांक २४ एप्रिल, २०२४.
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. मुशाशे-०४२४/प्र.क्र. ११३/१४-अे, दिनांक ९ जुलै, २०२४.
७. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. मुशाशे-०५२४/प्र.क्र.११३(भाग-१)/१४-अे, दिनांक ०५ सप्टेंबर, २०२४.
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृ.आ./फलो-४/मु.शा.सिं./र-७७९/२०२४, दिनांक ०३ डिसेंबर, २०२४.
९. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे कार्यालयाचे पत्र क्र. कृ.आ./फलो-४/मु.शा.सिं./र-७/२०२५, दिनांक २३.०१.२०२५.

**प्रस्तावना :**

राज्यातील शेतकऱ्यांना शाश्वत सिंचनाची सोय उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने अवर्षणप्रवण क्षेत्र तसेच आत्महत्याग्रस्त व नक्षलग्रस्त जिल्ह्यात मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना राबविण्यास दिनांक १९ ऑगस्ट, २०१९ रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली असून सदर योजना राज्यातील उर्वरित तालुक्यांमध्ये देखील राबविण्याचा निर्णय शासनाने दिनांक १८ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

सन २०२४-२५ मधील वित्त विभागामार्फत मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीच्या मर्यादेत मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेच्या ₹४०० कोटीच्या (सूक्ष्म सिंचनाकरिता पूरक अनुदान

घटकासाठी ₹३०० कोटी + वैयक्तिक शेततळे या घटकासाठी ₹१०० कोटी) कार्यक्रमास दिनांक १६ मे, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. कृषि आयुक्तालयाकडून सूक्ष्म सिंचनाकरिता पूरक अनुदान घटकासाठी प्राप्त निधी मागणी व सद्य:स्थितीत असलेल्या प्रलंबित दायित्वाच्या अनुषंगाने मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनाकरिता पूरक अनुदान घटकासाठी ₹१४४.०० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२४-२५ या वर्षात मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेकरिता ₹१४४.०० कोटी (रुपये एकशे चव्वेचाळीस कोटी फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत असून सदर निधीचे योजनेंतर्गत घटकनिहाय वितरण पुढीलप्रमाणे:

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | योजनेंतर्गत मंजूर घटक | वितरीत निधी |
|---|---|---|
| १. | सूक्ष्म सिंचन<br>[केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानास पूरक (सूक्ष्म सिंचन) अनुदान]<br>अ. ठिबक सिंचन<br>आ. तुषार सिंचन | १४४.०० |
| | **एकूण...** | १४४.०० |

२. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ च्या मंजूर तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. डी-३,
२४०१, पिक संवर्धन,
(००)(२२) मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना,
(सर्वसाधारण)(कार्यक्रम),
३३, अर्थसहाय्य,
(२४०१ बी०७२)

३. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड व अनुदान मंजुरीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

४. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे. | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे. |
| २. | जिल्हा स्तर | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी. | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५. मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेची अंमलबजावणी करताना राष्ट्रीय कृषि विकास योजना - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करावे.

६. आयुक्त (कृषि) यांनी योजनेंतर्गत मंजूर निधी संबंधित जिल्ह्यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे वितरित करावा.

७. राष्ट्रीय कृषि विकास योजना - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या योजनेच्या प्रत्यक्ष दायित्वानुसारच निधी आहरित करण्यात यावा. तसेच, निधी बँक खात्यामध्ये अखर्चित पडून राहणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

८. या शासन निर्णयान्वये वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करावे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार, नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ०२/२०२५/व्यय-१, दिनांक ०५ फेब्रुवारी, २०२५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१४१५३७३८६२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2025.02.14 15:39:02 +05'30'

**(अं.सा. चंदनशिवे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
७. सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य /महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
११.प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
१३.आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१६.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर.
१७.सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन ५ वा मजला, मुंबई.
१८. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१९.सहाय्यक संचालक (लेखा-१), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०.वित्त विभाग (व्यय १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय, मुंबई,
२१.नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,
२२.निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.